लपात उचंगी, ता.आजरा, जि.कोल्हापूर योजनेस, प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा १००९/(१८२/२००९)/ ल.पा.१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ फेब्रुवारी, २०१५

वाचा :-

१) **महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र क्र.मकृखोविम /२०९/ (६४/२००९)/लपा-२/६६०९/सन २००९, दि.२२/०९/२००९ चे पत्र.**

२) **वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२ यांचे पत्र क्रं. व्ययस- २०१४/प्रक्र१९९/अर्थ-२, दि.१ जानेवारी, २०१५.**

**प्रस्तावना**

कोल्हापूर जिल्ह्यातील लपात उचंगी या योजनेस दिनांक १३/०२/९६ अन्वये रु.१५११.९२ लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली होती. सदर अंदाजपत्रक १९९४-९५ च्या दरसुची नुसार तयार करण्यात आलेले होते.प्रकल्पाचे काम सुरु असतांना दरसूचीच्या दरातील वाढ, भूसंपादनाच्या किंमतीतील वाढ, संकल्पचित्रातील बदलांमुळे व इतर कारणांमुळे (निविदा अधिक्य इ.) किंमतीत झालेल्या वाढीमुळे सन २००१-२००२ ची दरसुची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु ५८७२.८२ लक्ष रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे कडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधिन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

१) कोल्हापूर जिल्ह्यातील लपात उचंगी या योजनेस सन २०१०-२०११ ची दरसूचीवर आधारित केलेल्या सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या अंदाजित रु ५८७२.८२ लक्ष (रुपये अठठावन्न कोटी बहात्तर लाख ब्याऐंशी हजार फक्त) या किंमतीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी कामासाठीची एकूण तरतूद रु.५५८८.४४ लक्ष (रुपये पंच्चावन कोटी अठयाऐंशी लाख चवेचाळीस हजार फक्त) व अनुषंगिक खर्चासाठीची एकूण तरतूद रु.२८४.३८ लक्ष (दोन कोटी चौ-याऐंशी लाख अडतीस हजार फक्त) आहे. अंदाजित किंमतीचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२) व्यय अग्रक्रम समितीच्या दि.२१ ऑगस्ट २०१४ रोजी झालेल्या बैठकीच्या इतिवृत्तातील " प्रकल्प, लाभव्यय गुणोत्तर, प्रती सघमी पाणीसाठा व आर्थिक परतावा दर इत्यादी मापदंडात बसतो. प्रकल्पांतर्गत सर्व कोप बंधा-याची कामे १०० टक्के पूर्ण झाली आहेत. त्यामुळे प्रकल्पाची घळभरणी पूर्ण होऊन पाणीसाठा केल्याने, प्रकल्पातील एकूण १७९७ हेक्टर लाभक्षेत्र सिंचनाखाली येणार आहे.मुख्यत: निव्वळ दरसूचीतील फरकामुळे व भूसंपादन व पुनर्वसन खर्चात वाढ झाल्याने प्रकल्पाच्या खर्चात वाढ झाली आहे. भूसंपादन आता पूर्ण होत आले आहे.पुनर्वसनासाठी नियमित १८ सुविधांचा विचार केला आहे. त्यामुळे प्रकल्प पूर्ण होणेसाठी सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता असल्याचे प्रधान सचिव (जलसंपदा) यांनी नमूद केले. त्यामुळे सदरचा सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मान्य व्हावा." या अटीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यतेचा हा निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३) या योजनेच्या कामावरील खर्च मागणी आय ५ "४७०२, लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च-१९०, सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमा यांतील गुंतवणुका (००)(०१) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळचा भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (४७०२ ४७९४) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यांत यावा.

४) हा शासन निर्णय,नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७१/का.१४३४ दि.२५/०६/२०१३ आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २७९/व्यय १२ दि.१६/०९/२०१३ अन्वये तसेच व्यय अग्रक्रम समीतीने दि. २१ ऑगस्ट २०१४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार व संदर्भ क्रं २ नुसार याबाबतच्या निर्गमीत केलेल्या इतिवृत्तानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५) या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. /२०१५ वर नोंदविण्यांत आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७१११६३४११२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2015.02.07 11:28:51 +05'30'

**( रा.बा.क्षीरसागर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

**अंदाजित किंमतीच्या गोषवाऱ्यासह :-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर.
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
४) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
५) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) जिल्हाधिकारी सोलापूर, सोलापूर
७) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ,सोलापूर.
८) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
९) उपसचिव (लपा)/ अवरसचिव (लपा)/उपअभियंता(लपा-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अर्थ १-२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क, महासंचालक, मंत्रालय, मुंबई.

**(शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. सुप्रमा १०११/(१०३/२०११) ल.पा.१, दि.५फेब्रु, २०१५ चे सहपत्र)**

**विवरण पत्र**

लपात उचंगी, ता.आजरा, जि.कोल्हापूर या योजनेचा अंदाजित किंमतीचा गोषवारा

| अ. क्र | उपशिर्ष | किंमत (रु. लक्ष) |
|---|---|---|
| १ | अ - प्राथमिक कामे | ९.७१ |
| २ | ब - भू संपादन | २७५३.४९ |
| ३ | सी - धरण | ११५०.०८ |
| ४ | सांडवा | १०६९.७७ |
| ५ | ड- विमोचक | १७६.११ |
| ६ | के- इमारत | ५.५० |
| ७ | एम- प्लँन्टेशन | ०.५० |
| ८ | ओ संकीर्ण | १०.०० |
| ९ | प देखभाल | ६.९८ |
| १० | आर दळणवळण | १२.२५ |
| ११ | को.प. बंधारे | ३९४.०५ |
| १२ | एकूण | ५५८८.४४ |
| १३ | इ. टी.पी. चार्जेस | २८४.३८ |
| | **एकूण** | **५८७२.८२** |

**ठळक वैशिष्टे**

१. योजनेची सिंचन क्षमता - १७९७ हेक्टर
२. नियोजित पाणी साठा - १७४८० स.घ.मी.
३. पाणी साठ्याची प्रती स.घ.मी किंमत - रु. ३३५९७/-स.घ.मी.
४. लाभव्यय गुणोत्तर - १.४४ > १.